**वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग- दुसरा - मुंबईसह राज्य पोलीस दलातील श्वान पथके तसेच बॉम्ब शोधक व नाशक पथकातील श्वानांचे खाद्य, विमा खर्च व अनुषंगिक खर्च भागविण्याकरिता गृह विभाग शासन निर्णय दि. २७/०९/२०१३ अन्वये प्रदान करण्यात आलेली प्रतिश्वान रु. १.०० लक्ष/ प्रतिवर्ष ही वित्तीय मर्यादा वाढवून प्रतिश्वान रु.२.०० लक्ष/प्रतिवर्ष इतकी करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:** एमआयएस २०२३/प्र.क्र. ८५/ अर्थ-१

दुसरा मजला, मंत्रालय मुख्य इमारत

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२

तारीख: ०५ एप्रिल, २०२४

वाचा :- १. शासन निर्णय, गृह विभाग क्र. एमआयएस/२४१३/प्र.क्र. १५८/२०१३/ अर्थसं-१, दि.२७/०९/२०१३

२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र. पोमंस/३३/वित्तीय मर्यादा वाढ/६६/२०१७, दिनांक ०४/०३/२०२४ चे पत्र

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील शहरात वारंवार होणाऱ्या अतिमहत्त्वाच्या व्यक्तींच्या भेटी, त्यांचा ताफा, राहण्याचे / कार्यक्रमाचे ठिकाण, विधानभवन इत्यादी महत्त्वाच्या ठिकाणी श्वानांमार्फत घातपातविरोधी तपासणी करावी लागते. तसेच सद्यपरिस्थितीत राज्यात अतिरेकी व घातपाती कारवाईत अत्याधुनिक शस्त्रे व स्फोटके यांचा वापर वाढत आहे. सदर शस्त्रे व स्फोटके यांच्या शोधकामासाठी विशेष श्वानांची आवश्यकता आहे. राज्य पोलीस दलातील श्वान पथके तसेच बॉम्ब शोधक व नाशक पथकातील श्वानांचे खाद्य,विमाखर्च औषधोपचार व अनुषंगिक खर्चाची शासन निर्णय, गृह विभाग क्र. एमआयएस/२४१३/प्र.क्र. १५८/२०१३/ अर्थसं-१, दि.२७/०९/२०१३ अन्वये विभाग प्रमुख यांना प्रतिश्वान प्रतिवर्षी रु. १ लक्ष इतकी वित्तीय मर्यादा निश्चित केलेली आहे. परंतु, सद्यस्थितीत वाढत्या महागाईमुळे विभाग प्रमुख यांना प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार अपूरे पडत आहेत. या बाबी विचारात घेऊन राज्य पोलीस दलातील श्वान पथके तसेच बॉम्ब शोधक व नाशक पथकातील श्वानांचे खाद्य, विमा खर्च, औषधोपचार व इतर अनुषंगिक खर्च याकरिता विभाग प्रमुखांना प्रदान करण्यात आलेल्या प्रतिश्वान प्रतिवर्षी रु. १ लक्ष वरून रु. २ लक्ष इतकी वित्तीय अधिकारामध्ये वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबईसह राज्य पोलीस दलातील श्वान पथके तसेच बॉम्ब शोधक व नाशक पथकातील श्वानांचे खाद्य, विमा खर्च व अनुषंगिक खर्च भागविण्याकरिता प्रतिश्वान रु. १.०० लक्ष/ प्रतिवर्ष ही वित्तीय मर्यादा वाढवून प्रतिश्वान रु. २.०० लक्ष/प्रतिवर्ष इतकी करण्यास खालीलप्रमाणे शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वित्तीय शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम असलेले प्रचलित/प्रस्तावित प्राधिकारी | प्रदान करण्यात येत असलेले वित्तीय अधिकार | अटी |
|---|---|---|---|---|
| १ | मुंबईसह राज्य पोलीस दलातील श्वान पथके तसेच बॉम्ब शोधक व नाशक पथकातील श्वानांचे खाद्य, विमा खर्च, औषधोपचार व इतर अनुषंगिक खर्च<br><br>(गृह विभाग, शासन निर्णय दि. २७/०९/२०1३ मधील अ.क्र. २) | विभाग प्रमुख | रु. २ लक्ष | १) उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. भाखंस/२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१/१२/२०१६ अन्वये विहित केल्यानुसार खरेदी करण्यात यावी.<br>२) खरेदीसंदर्भात अस्तित्वात असलेले सर्व संबंधित प्रचलित नियम व कार्यपध्दती अनुसरणे बंधनकारक.<br>३) अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध असली पाहिजे. |

प्रस्तुत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार अर्थसंकल्पिय अनुदानाच्या उपलब्धतेच्या अधीन राहतील. तसेच विहीत केलल्या वित्तीय मर्यादेपेक्षा जास्त खर्च अपेक्षित असल्यास अथवा विहीत अटींपैकी एखादी अट पूर्ण होत नसेल तर अशा प्रस्तावास वित्त विभागाची मंजूरी आवश्यक राहील.

हे आदेश शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र. १५/२०२४/व्यय-७, दिनांक ०६/०१/२०२४ च्या अनौपचारिक संदर्भान्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४०५१८१४०४२२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANOJ DATTATRAY JADHAV

Digitally signed by MANOJ DATTATRAY JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2766AFDA86350272237DCF9A191545970F7F12E66D0605C664CA2BF0F3001DC0, cn=MANOJ DATTATRAY JADHAV
Date: 2024.04.05 18:26:18 +05'30'

**( मनोज द. जाधव )**

**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

पोलीस महासंचालक. महाराष्ट्र राज्य, मुंबई

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई

महालेखापाल (लेखा परीक्षा/लखा व अनुज्ञेयता) १/२,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सहसंचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
वित्त विभाग (अर्थ-११/व्यय-७/व्यय-८/विनियम), मंत्रालय, नुव
गृह विभागातील सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव/ कार्यासन अधिकारी